नक्षलग्रस्त भागातील गट "क" ची पदे प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतून वगळण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्र. प्रानिमं-३०९७/प्र.क्र. ३५/९७/१३-अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १४ ऑक्टोबर, १९९७

संदर्भ :- शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक: प्रानिमं-३०९७/प्र.क्र. ३५/९७/१३-अ, दि. ८.८.९७.

शासन निर्णय :-

संदर्भाधीन दिनांक ८ ऑगस्ट, १९९७ च्या आदेशान्वये नक्षलग्रस्त जिल्हयातील गट "क" ची पदे निवडमंडळाच्या कक्षेतून वगळून शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र. विकाका-१०८८/प्र.क्र. ६४/योजना-१२, दि. १९.१.८९ च्या आदेशातील परिच्छेद क्र.४ मधील बाब क्र. ८ नुसार जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या समितीकडे सोपविण्यात आलेली आहेत. या संदर्भात येणा-या अडचणी विचारात घेऊन शासन खालीलप्रमाणे सुधारित आदेश निर्गमित करीत आहे :-

१. सदर आदेश हे चंद्रपूर, गडचिरोली, भंडारा, यवतमाळ व नांदेड या जिल्हयांपुरतेच मर्यादित राहातील.

२. या आदेशान्वये केवळ प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेत असणारी जिल्हास्तरीय, जिल्हासेवांमधील गट-क ची पदे वगळण्यात आली आहेत. मात्र या जिल्हयामधील जी पदे राज्यस्तरीय आहेत व ती महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळाकडून भरली जातात, ती पदे पूर्वीप्रमाणेच महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळाकडूनच भरली जातील.

३. नक्षलग्रस्त जिल्हयातील ज्या पदांच्या अनुषंगाने निवड मंडळाने जाहिराती देऊन परीक्षा घेतल्या असतील अशा सर्व प्रकरणी निवड मंडळाने कार्यवाही पूर्ण करुन उमेदवारांच्या नेमणूका करण्यासाठी संबंधित नियुक्ती प्राधिका-याकडे शिफारशी कराव्यात.

४. नक्षलग्रस्त जिल्हयातील ज्या पदांच्या अनुषंगाने निवड मंडळाकडे मागणीपत्र आलेले असेल व ज्यावर कार्यवाही केलेली नसेल अशी सर्व मागणीपत्र जिल्हाधिका-यांच्या

GR-20040406175510001-0100

समितीकडे सोपविण्यात यावीत. जाहिरात देऊन अर्ज मागविलेले असतील तर सदरहू अर्ज पुढील उचित कार्यवाहीसाठी समितीकडे पाठवावेत.

५. हे आदेश पुढील आदेश होईपर्यन्त अंमलात राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ ना. ना. भडीकर ]
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१. राज्यपालाचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मुख्यमंत्र्याचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग.
८. विभागीय आयुक्त, नागपूर, औरंगाबाद, नाशिक, अमरावती.
९. अध्यक्ष, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई-१.
१०. सदस्य सचिव, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई-१.
११. सदस्य सचिव, प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडल, अमरावती-मुख्यालय अकोला, औरंगाबाद, नागपूर.
१२. सदस्य सचिव, उर्वरित प्रादेशिक दुय्यम सेवा निवड मंडळे,
१३. जिल्हाधिकारी, चंद्रपूर, गडचिरोली, नांदेड, भंडारा, यवतमाळ, धुळे,
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, चंद्रपूर, गडचिरोली, नांदेड, भंडारा, यवतमाळ, धुळे,
१५. निवड नस्ती [दोन प्रती].